**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग (खुद्द) कार्यालयाच्या आस्थापनेवरील वाहनांचा आढावा.**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,**
**शासन निर्णय क्र.वाहन(आढावा)२०२०/प्र.क्र. ७०४/आस्था-२**
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
**दिनांक :- १७ जानेवारी, २०२०**

**वाचा :** १. शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.वाहन १०००/प्र.क्र.६५/२००१/विनियम, दि. १०.९.२००१.
२. शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.वाहन १००५/प्र.क्र.१३/२००५/विनियम, दि. २५.५.२००५.
३. शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.वाहन १००७/प्र.क्र.४८/२००७/विनियम, दि. ३१.१२.२००७.

**प्रस्तावना :**

वित्त विभागाने त्यांच्या संदर्भीय शासन निर्णय दिनांक १०.९.२००१ अन्वये शासकीय व इतर कार्यालयांमध्ये वाहनाच्या वापराबाबत धोरण निश्चित केले आहे. त्यासाठी प्रत्येक प्रशासकीय विभागाने त्यांचेकडील (प्रादेशिक कार्यालयासह) वाहनांचा आढावा घेण्याचे निर्देश वित्त विभागाकडून देण्यात आले आहेत. त्यास अनुसरून सहकार , पणन व वस्त्रोद्योग विभाग (खुद्द), मंत्रालय, मुंबई अंतर्गत अनुज्ञेय वाहनांबाबतचा आढावा घेण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग (खुद्द) कार्यालयाच्या आस्थापनेवरील सर्व पदांची कर्तव्ये व जबाबदाऱ्या विचारात घेऊन राज्यस्तरीय वाहन आढावा समितीने दिलेल्या मान्यतेस अनुसरून सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग (खुद्द) करिता खालील अटींच्या अधीन राहून खालील तक्त्यात दर्शविल्यानुसार ६ वाहने अनुज्ञेय करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | वाहन अनुज्ञेय आहे असे पदनाम | वाहन आढाव्यानुसार अनुज्ञेय वाहन संख्या |
|---|---|---|
| १. | मा.मंत्री (सहकार) | १ (कार) |
| २. | मा.मंत्री (पणन) | १ (कार) |
| ३. | मा.राज्यमंत्री (सहकार) | १ (कार) |
| ४. | प्रधान सचिव (वस्त्रोद्योग) | १ (कार) |
| ५. | सचिव (सहकार) | १ (कार) |
| ६. | स्टाफ कार | १ (जीप) |
| | **एकूण** | **६ वाहने** |

(१) जुने वाहन निर्लेखन करताना त्या प्रस्तावास प्राधिकृत अभिकरणाची मान्यता असावी.

(२) वाहन निर्लेखित करताना वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग पहिला, उपविभाग दोन, अनुक्रमांक १९-क नियम क्रमांक ६९ मधील अटीनुसार वाहन निर्लेखित करण्याची कार्यवाही करण्यात यावी.

(३) जुने वाहन निर्लेखित केल्यानंतर नवीन वाहनाची खरेदी शासनाने विहीत केलेली कार्यपध्दती अवलंबून, शासनाने वेळोवेळी विहीत केलेल्या अटी व शर्तींच्या अधीन राहून व त्यास शासनाची मान्यता घेऊन करण्यात यावी.

३. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. २९७/१४/विनियम, दि.१७.५.२०१४ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीने व मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००११७१२०७०६९५०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Sudin Gaikwad

Digitally signed by Sudin Gaikwad
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Co-Operation Marketing and Textiles Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=20315cd32e197cc2334676dbe1f09f90b2334eddf7e75d09609003b414273f73, serialNumber=8ff188a569f4a95d2f0ce8ca61e60d8aa5f51a1bf65b42dd49bb26d165941d9e, cn=Sudin Gaikwad
Date: 2020.01.17 12:08:25 +05'30'

**( डॉ. सुदिन गायकवाड )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.मुख्य सचिव यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
२. अपर मुख्य सचिव (प्र.सु.),सामान्य प्रशासन विभाग तथा सदस्य, राज्यस्तरीय वाहन आढावा समिती, मंत्रालय,मुंबई-३२,
३. अप्पर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग तथा अध्यक्ष, राज्यस्तरीय वाहन आढावा समिती, मंत्रालय,मुंबई-३२,
४. प्रधान सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई -३२,
५. सचिव (ले.व को.), वित्त विभाग, मंत्रालय,मुंबई,
६. परिवहन आयुक्त तथा सदस्य सचिव, राज्यस्तरीय वाहन आढावा समिती,
७. नियंत्रक, शासकीय परिवहन सेवा, सर पोचखानवाला रोड, सी फेस, वरळी, मुंबई-२५,
८. सर्व सह सचिव/उपसचिव/कक्ष अधिकारी,सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय,मुंबई-३२
९. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरिक्षा), महाराष्ट्र राज्य-१ व २, मुंबई/नागपूर,
१०. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
११. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१२. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई,
१३. वित्त विभाग (कार्या-विनियम), मंत्रालय, मुंबई-३२,
१४. रोखशाखा, स.प.व व.विभाग, मंत्रालय, मुंबई-३२,
१५. निवड नस्ती-आस्था-२